स्वयंरोजगार निर्मितीच्या योजनांचे
मूल्यमापन करण्यासाठी सचिव समितीची
स्थापना करणेबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**रोजगार व स्वयंरोजगार विभाग**
शासन निर्णय क्रमांक : इएसई २००१/प्र.क्र.७१/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय इमारत, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०२ मे, २००१

**प्रास्ताविक** : महाराष्ट्र राज्याचे रोजगार व स्वयंरोजगारविषयक नवीन धोरण ६ ऑक्टोबर, २००० पासून अमलात आले आहे. या धोरणा अंतर्गत कार्यक्रमाच्या अम्मलबजावणीचा आढावा मा. मुख्य सचिव यांनी दि.०७ एप्रिल, २००१ रोजी घेतला. या धोरणांमध्ये मंत्रीमंडळ उप समितीने विद्यमान योजनांचे एका स्वतंत्र संस्थेमार्फत मुल्यमापन करण्यात यावे, अशी शिफारस केली आहे. तद्अनुषंगाने बैठकीतल चर्चेत असे निदर्शनास आले की, विविध विभागांकडून राबविण्यात येत आलेल्या योजनांचा मुल्यमापन अभ्यास स्वतंत्र संस्थेमार्फत केल्यास विशेष फायदा होणार नाही, कारण या संस्था संबंधीत विषयातील तज्ञ असतीलच असे नाही, शिवाय मूल्यमापन हे साधारणतः यादृच्छिक निवड पध्दतीने (Randam Selection) केले जाते त्यामुळे ते अचुक असेलच असे नाही. यास्तव त्याऐवजी या योजनांचे मुल्यमापन करण्यासाठी त्याचबरोबर स्वयं रोजगारासाठी अर्थसहाय्य व कर्ज वितरण यामध्ये एकसुत्रता आणण्याबाबतचा अनुषंगिक विषय अभ्यासून शिफारशी करण्यासाठी संबंधित विभागाच्या सचिवांची एक समिती नेमणे संयुक्तिक होईल. सदर बैठकीतील या निष्कर्षानुसार विद्यमान योजनांचे मुल्यमापन करण्यासाठी तसेच त्यांमधील अर्थसहाय्य व कर्ज वाटप पध्दतीत एकसुत्रता आणण्यासाठी सचिवांची समिती स्थापन करणे, शासनाच्या विचाराधीन होते त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** : शासनाच्या विविध विभागाकडून रोजगार व स्वयंरोजगार निर्मितीच्या विविध योजना कार्यान्वित असून सदर योजनांचे मूल्यमापन करणे, योजनां राबविण्यामध्ये विशेषतः अर्थसहाय्य व कर्ज वितरण इत्यादीमध्ये एकसुत्रता आणणे व या योजना जास्तीत जास्त लोकाभिमुख करणे याकरिता मा. सल्लागार, रोजगार व स्वयंरोजगार यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.:-

| | |
|---|---|
| १. मा. सल्लागार, (रोस्वरो.) | अध्यक्ष |
| २. सचिव (आदिवासी) | सदस्य |
| ३. सचिव (समाजकल्याण) | सदस्य |
| ४. प्रधान सचिव (नगरविकास) (२) | सदस्य |
| ५. सचिव (ग्राम विकास ) | सदस्य |
| ६. उद्योग विकास आयुक्त | सदस्य |




GR-200204081455250000-2600

७. सचिव (जलसंधारण) — सदस्य
८. सचिव (रोजगार व स्वयंरोजगार ) — सदस्य
९. उप सचिव (रोजगार व स्वयंरोजगार ) — सदस्य-सचिव

२. ही समिती शासनाच्या विविध विभागांमार्फत राबविण्यात येत असलेल्या योजनांचे सर्वांग मूल्यमापन करील तसेच स्वयंरोजगार योजनांतर्गत अर्थ सहाय्य व कर्ज पुरवठा यात एकसुत्रता आणून एक समरुप पध्दत निश्चित करील व तसा आपला अहवाल ३ महिन्यात शासनास सादर करील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु. प्र. पाण्डेय)
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रती,

मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
मा.उपमुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव
मा. सल्लागार, रोजगार व स्वयंरोजगार
सचिव, आदिवासी
सचिव, समाजकल्याण
प्रधान सचिव, नगरविकास (२)
सचिव, ग्राम विकास
सचिव, जलसंधारण
मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
व्यवस्थापकीय संचालक, सर्व शासकीय निम शासकीय महामंडळे, (मंत्रालयीन विभागार्फत),
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, म.रा., कोकण भवन, नवी मुंबई
उप संचालक, विभागीय मुख्यालये, रोजगार व स्वयंरोजगार, मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबद/अमरावती व नागपूर.
विभागीय प्रसिध्दी अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासन अधिकारी, रोस्वरो. विभाग
निवड नस्ती, रोस्वरो-१.

GR- 200204081455250000-2600